**अमरावती विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचा-यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये निवडीने नियुक्त्या.**

**महाराष्ट्र शासन**
आदेश क्रमांक:-मविसे १०/२००८/प्र.क्र.१४९/आस्था-३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २३ जून, २०१०

## आदेश

जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील श्री.व्ही.पी.लोखंडे,विस्तार अधिकारी (पंचायत ) जिल्हा परिषद, यवतमाळ यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या पदावर रुपये ९३००-३४८०० ग्रेड पे रुपये ४४००/- या वेतनश्रेणीत प्रशासकीय हितास्तव व तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्ती देण्यात येत आहे.

२. निवडीने नियुक्तीनंतर महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये सदर अधिका-यांची नियुक्ती त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिका-याचे नांव | सध्याचे पद | निवडीने नियुक्ती नंतरचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.व्ही.पी श्री.लोखंडे | विस्तार अधिकारी (पंचायत ) जिल्हा परिषद, यवतमाळ | गट विकास अधिकारी, वणी जिल्हा यवतमाळ ( रिक्त पदी ) |

३. वरील परिच्छेद २ मधील कर्मचा-यांस देण्यात आलेली निवडीने नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) श्री.लोखंडे यांची निवड नियुक्ती ही तात्पुरती स्वरुपाची असून ती ११ महिन्यानंतर संपुष्टात येईल. तसेच सदर नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून, देण्यात येत आहे.

ब) सदर निवडीने नियुक्ती ही संबंधित अधिका-यांने महाराष्ट्र विकास सेवा विभागीय परिक्षा नियम १९९१ व सुधारणा नियम १९९८ मधील तरतूदी नुसार विहीत मुदतीत परिक्षा उतीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

क )सदर निवडीने नियुक्ती ही शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही १०८७/२०० /प्र.क्र.३ /८७ / १२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

ड)सदर निवडीने नियुक्ती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत. परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत. अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

**इ) <u>सदर निवडीने नियुक्ती</u> <u>ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक ८४५२ / २००४ मध्ये होणा-या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.</u>**

ई) सदर निवडीने नियुक्ती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

फ) सदर पदोन्नती ही बिंदू नामावली नोंदवही मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. श्री.लोखंडे यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको

... समजून , शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग , क्रमांक: एसआरव्ही १०८७ / ११३१ / प्र.क्र.११/८९ / ... दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या केलेल्या निवडीने नियुक्त्या रद्द करण्यात येतील.

संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण ...स यंत्रणा यांनी निवडीने नियुक्त झालेल्या कर्मचा-यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन , तात्काळ ...मुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. ...व संबंधित कर्मचा-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

श्री.लोखंडे यांनी त्यांच्या नविन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर ... नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी ...याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील. याची ...धितांनी नोंद घ्यावी.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक ...तांक २०१००६२३१९२३००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सरिता बांदेकर-देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

...चिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( पत्राने )
...सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
...विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती
...मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
...मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद , यवतमाळ
...महालेखापाल, महाराष्ट्र राज्य- महाराष्ट्र- २ नागपूर
...खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
...खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री,( ग्राम विकास )
...सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
...संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
...कार्यासन क्रमांक आस्था-२ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
...निवड नस्ती, का.क्र. आस्था-३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग